एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या प्रचार व प्रसिद्धीच्या अनुषंगाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत नियुक्त करण्यात आलेल्या जाहिरात संस्थानी केलेल्या कामांची तपासणी करण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः मफुयो -२०२०/प्र.क्र. १७६/आरोग्य-६**

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
तारीख: १४ डिसेंबर, २०२१.

**वाचा -**

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई यांचे क्र. राआहसो/ माशिसं/ काअ/१००२२/१८७१/२०२१, दिनांक ३०.११.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना -**

मा. मंत्री सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांच्या अध्यक्षतेखाली दि. २६ नोव्हेंबर २०२० रोजी संपन्न झालेल्या बैठकीमध्ये एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना आणि आयुष्यमान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेची जनसामान्यांमध्ये विविध समाजमाध्यमे व माध्यमांद्वारे प्रचार व प्रसिद्धी करण्यासाठी रु. २,५०,००,०००/- इतक्या खर्चाच्या मर्यादेपर्यंतचा आराखडा माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात आला होता. सदर आराखड्यानुसार प्रचार व प्रसिद्धी करण्याकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत निविदा प्रक्रियेद्वारे मे. कन्सेप्ट कम्युनिकेशन्स व मे. स्पॅन कम्युनिकेशन्स या दोन प्रसिद्धीचे कार्य करणाऱ्या खाजगी संस्थाची निवड करण्यात आली आहे. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून नियुक्त करण्यात आलेल्या संस्थांकडून जी कामे करण्यात आली आहेत, त्यांची तपासणी करून प्रमाणित करणे व देयक अदा करण्यास मान्यता देण्याकरिता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून नियुक्त करण्यात आलेल्या खाजगी संस्थांमार्फत केलेल्या कामांना महासंचालनालयाकडून प्रमाणित करण्यात येत नसल्यामुळे जाहिरात संस्थांचे देयक अदा करण्यास अडचणी येत आहेत. त्यादृष्टीकोनातून याविषयी निर्णय घेण्याकरिता शासनाने समितीचे गठन करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून नियुक्त करण्यात आलेल्या संस्थांकडून जी कामे करण्यात आली आहेत त्या देयकांची तपासणी करून प्रमाणित करणे व देयक अदा करण्यास मान्यता देण्यास व समितीची कार्यकक्षा विहीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**समितीची रचना-**

| | | |
|---|---|---|
| १ | उपसंचालक,राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, सार्वजनिक आरोग्य सेवा पुणे | अध्यक्ष |
| २ | संपर्क अधिकारी, सा. आ. वि., मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ३ | वित्तीय सल्लागार, रा. आ. ह. सो | सदस्य |
| ४ | महाव्यवस्थापक (प्रशासन), रा. आ. ह. सो | सदस्य सचिव |

३. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे प्रस्तावित आहे.

१. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाव्दारे नियुक्त करण्यात आलेल्या मे. कन्सेप्ट कम्युनिकेशन्स मार्फत ५ TVC, २ रेडिओ जिंगल्स यांच्या गुणवत्तेची तपासणी करून त्याचे telecast/broadcast करण्याबाबत योग्य ते माध्यम ठरविणे.

२. स्पॅन कॉम्युनिकेशन यांनी तयार केलेला व्हिडीओ सोशल मीडियावर प्रसारित करण्यात आला असून त्याच्या देयकाची तपासणी करून देयकाची अदायगी करण्याविषयी निर्णय घेणे.

३. कन्सेप्ट कम्युनिकेशन्स यांनी तयार केलेल्या एक प्रिंट क्रिएटिव्ह आणि त्याआधारे तयार केलेल्या होर्डिंग्स माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाद्वारे नियुक्त केलेल्या विविध संस्थांद्वारे महाराष्ट्र राज्यात उभारण्यात आले असून त्या देयकाची तपासणी व अदायगीबाबत निर्णय घेणे.

४. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या कार्यादेशानुसार कन्सेप्ट कॉम्युनिकेशन्स यांनी दोन प्रिंट क्रिएटिव्ह तयार करणे आवश्यक होते त्यापैकी यापूर्वी एक प्रिंट क्रिएटिव्ह त्यांनी तयार केले होते व त्याचा वापर होर्डिंग केला आहे. उर्वरित एक प्रिंट क्रिएटिव्ह कन्सेप्ट कॉम्युनिकेशन्स यांच्याकडून तयार करून सदर क्रिएटिव्ह शासनाच्या होर्डिंग्सवर प्रदर्शित करण्याबाबतची कार्यवाही ठरविणे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१४१३०३५६९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2021.12.14 14:13:54 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

२. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, माहिती व जनसपंर्क महासंचालनालय, मंत्रालय, मंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. संचालक-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे
८. सहसंचालक, आरोग्य सेवा, पुणे
९. उपसंचालक,राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, सार्वजनिक आरोग्य सेवा, पुणे
१०.संपर्क अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११.वित्तीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
१२.महाव्यवस्थापक (प्रशासन), राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई
१३.निवड नस्ती.